# सौष्ठव

संपादक : श्रीधर तिळवे

## या पुरवणीतील साहित्य

संपादकीय - श्रीधर तिळवे

भुजंग मेश्राम : आदिवासी मनाचा प्रगल्भ अविष्कार - श्रीधर तिळवे

## संपादकीय

मराठीतील 'आहे रे' जाणीवेतून जन्मलेला प्रगल्भ काव्याविष्कार मनोज जोशीच्या रूपाने सादर केल्यानंतर, इथे आता आम्ही आदिवासी मनाची कविता सादर करणाऱ्या भुजंग मेश्राम ह्यांच्या 'ऊलगुलान' ह्या संग्रहा संदर्भातील काव्यजाणीवेचा धांडोळा सादर करीत आहोत. ज्यांना भुजंगच्या कविता वाचायच्या असतील त्यांनी त्यांचा 'ऊलगुलान' हा संग्रह पहावा.

श्रीधर तिळवे

# भुजंग मेश्राम : आदिवासी मनाचा प्रगल्भ अविष्कार

श्रीधर तिळवे

मराठीत ब्राम्हणी सत्यकथावादी समीक्षकांचा अपवाद वगळता आज १९६० नंतर मराठी साहित्याने एक वळण घेतले ह्यावर जवळजवळ सर्वच समीक्षकांचे एकमत झालेले दिसते. १९६० ते १९८० हा कालखंड ते नेहमीच गौरवतात आणि १९८० ते १९९८ हा कालखंड मात्र सृजनात्मक पातळीवर अत्यंत दुय्यम ठरवतात. माझ्या मते ह्या कालखंडांला समजून न घेताच हे विधान केले जाते. १९६० ते १९८० हा कालखंड देशीवादी कालखंड असून सर्वसाधारणपणे ह्यात १) लघुनियतकालीके २) दलीत ३) ग्रामीण अशी तीन बंडे झाली. माझ्या मते मराठी साहित्याचा प्रवाह इथेच थांबलेला नाही. १९८० नंतरही १)स्त्रीवादी २) आदिवासी ३) मुस्लीमख्रिश्चन साहित्य अशा तितक्याच महत्त्वाच्या वाङ्मयीन चळवळी उभ्या राहिल्या आहेत. इतकेच नव्हे तर आधीच्या चळवळींना नवे वळण लावणारे साहित्य ह्याच काळात जन्मलेले आहे. १९६० ते १९८० हा कालखंड जर देशीवादी असेल तर १९८० ते १९९८ हा कालखंड उत्तरदेशीवादी आहे असे म्हणायला हरकत नाही. अनुराधा पाटील, मल्लीका अमरशेख, रजनी परुळेकर, नीरजा, कविता महाजन वगैरे ह्यांनी कवितेत स्त्रीवादाची पायाभरणी ह्याच कालखंडात केली आहे, तर राजन खान, समर खडस, शफाअत खान ह्यांनी हिंदूतर साहित्याचा प्रवाह मोकळा केला आहे. दलीत नाटकांची सुरूवात ह्याच काळात झाली आहे. प्रेमानंद गज्वी, दत्ता भगत ह्यांनी अतिशय महत्त्वाचे नाट्यलेखन ह्याच काळात केले आहे. कथेत मेघना पेठेंनी गौरी देशपांडेंच्या रोमॅण्टीक स्त्रीवादाला छेद देणाऱ्या रसरशीत कथा ह्याच काळात लिहील्यात. ह्याच काळात श्याम मनोहर ह्यांनी वास्तववादी नेमाडे पंथीयांना छेद देणाऱ्या कोसलातील नेमाडे व सात सक्कमधल्या किरण नगरकरांना पुढे नेणाऱ्या उत्तर आधुनिक कादंबऱ्या लिहील्यात. विशेषतः कळमध्ये त्यांनी हे तंत्र वापरले आहे. त्यांचा आशय मात्र देशावादीच आहे आणि देशीवादी हा उत्तरआधुनिकतेचाच अविष्कार असल्याने त्यांच्या साहित्याला उत्तरदेशीवादी म्हणणेच योग्य असे मला वाटते. ह्याच कालखंडात मराठी साहित्यात आणखी एक क्रांतीकारक वळणाची भर पडली. हे वळण आहे आदिवासी साहित्याचे. ज्याला खरोखर उत्तरदेशीवाद

म्हणता येईल असे हे साहित्य आहे. एक तर हा वर्ग वर्णव्यवस्थेच्या मेगॅस्ट्रक्चरच्या पूर्ण बाहेर असल्याने त्याचा मूलतः स्वभावच देशीवादी आहे आणि मार्क्सचा तथाकथीत 'वर्ग' ह्या कॅटॅगिरीत तो बसत नसल्याने मार्क्सचा मेगॅस्ट्रक्चरमध्येही तो बसत नाही.

ह्या आदिवासी वर्गाला आपल्या मेगॅस्ट्रक्चरमध्ये सामावून घेण्यासाठी सहा मेगॅस्ट्रक्चरर्स काम करताना दिसतात.

१) ख्रिश्चन रिलीजीयस मेगॅस्ट्रक्चर - ह्यात धर्मगुरू
२) हिंदुत्त्ववादी मेगॅस्ट्रक्चर - वर
३) मानवतावादी मेगॅस्ट्रक्चर - गांधी किंवा इतर, आमटे, बंग
४) आंबेडकरवादी मेगॅस्ट्रक्चर
५) मार्क्सवादी मेगॅस्ट्रक्चर
६) सरकारी मेगॅस्ट्रक्चर

आदिवासी साहित्य समजून घ्यायचे असेल तर ही सर्व मेगॅस्ट्रक्चर समजून घेतली पाहिजेत आणि त्याबरोबरच आदिवासींची स्वत:ची स्थानिक स्ट्रक्चर्स समजली पाहिजेत.

भुजंगची कविता ही स्वत:ची स्थानिक रचना आणि इतर सहा महारचना ह्यांच्या परस्परसंबंधाचे एक व्यामिश्र जाळेच आपल्यापुढे सादर करते.

त्याच्या कवितेचा अवकाश हा प्रामुख्याने १) आदिवासी जंगल २) महानगर व ३) गाव ह्यांनी युक्त आहे. जंगलातील झाडं आणि पाणी ह्या संदर्भातील प्रतिमा त्याच्या कवितेत आपणाला मुबलक सापडतात कारण आदिवासी जीवनाच्या त्या आधार आहेत. जंगलात असताना त्याचा कवितेतील निवेदक हा इनसायडर म्हणजे आतला असतो तर महानगरात तो आऊटसायडरच (बाहेरचा) असतो. भुजंग त्याच्या कवितेत स्वत: बोलतो म्हणजे आत्मनिवेदन करतो. उदाहरणार्थ माझ्या जन्माबद्दल, शाळेबद्दल१ शाळेबद्दल२

हे आत्मनिवदेन कधी तो वाचकाला करतो, उदाहरणार्थ माझ्या जन्माबद्दल, शाळेबद्दल. भेटलेल्या कविता, जांगड, हंमी इथे इतरांबद्दल मी निवेदन करतो. कधी स्वत:लाच निवेदन करतो. उदाहरणार्थ चर्चा, अस्तित्व किंवा तो दुसऱ्या एखाद्या व्यक्तीला किंवा वस्तूला करतो. उदाहरणार्थ बातचित नर्मदेशी, बिरसा मुंडा, समुद्रपुत्र, जुगलबंदी, ग्रँडफादर किंवा संपूर्ण समाजाला करतो. उदाहरणार्थ नागपुत्रांच्या कविता, शोधयात्रा, लोक कुडकुडत आले मंजी. काहीवेळा भुजंग स्वत: बोलत नाही तर त्या पात्राच्या भूमिकेत शिरतो म्हणजेच पात्रनिवेदन करतो. हे पात्रनिवेदन स्वत:ला असते. दुसऱ्या एखाद्या व्यक्तीला वस्तूला उदाहरणार्थ बाजारहाट, आश्रमशाळेतल्या कविता, रेलाही ठेसन काहीवेळा तो संपूर्ण समाजाच्यावतीने निवेदन करतो. हे निवेदन एखाद्या व्यक्तीला असते. उदाहरणार्थ बोली हे लोकनिवेदन असते. गावबांधणी किंवा संपूर्ण समूहाला भेदिक पात्र : होकार निंदणी मधील लढाऊ स्त्री.

निवेदनाच्या इतक्या तऱ्हा मराठी कवितेत फार क्वचितच वापरल्या गेल्या असतील. अरुण कोलटकर आणि नारायण सुर्वेंनी वापरलेल्या निवेदनाच्या ह्या तऱ्हा भुजंग अधिक विकसीत करतो. अर्थात कोलटकरांपेक्षा त्याच्या पात्रनिवेदनाची शैली ही नारायण सुर्वेंशीच अधिक जुळते. मात्र नारायण सुर्वेंपेक्षा भुजंग तपशीलाबाबत अधिक समृद्ध वाटतो.

आदिवासी जीवनाबाबत कित्येक कवितात हा निवेदक अगदी सहज स्वाभाविक आहे पण जिथे 'ते' म्हणजे दुसरे येतात तिथे ही स्वाभाविकता लोप पावते आणि संघर्षासाठी तयार असणाऱ्या सचेतता आणि जागरूकता स्वाभाविकतेची जागा घेतात. महानगरातील प्रेम कवितात तर हा निवेदक अवघडलेलाच दिसतो. महानगरातील त्याचा बाहेरलापणा त्याला सोडत नाहीच. मध्यमवर्गीय जगण्याबाबत तो दुभंगला आहे की काय अशीही शंका येते.

भुजंगच्या कवितेत कुठेही विश्वानुभवाचा जिक्र नाही किंबहुना मोक्ष, निर्वाण ह्यांचा त्याला काडीचाही अनुभव नाही किंबहुना ह्याबाबत तो उदासीनच आहे त्याचे सारे अनुभव विश्व हे सृष्टी, ह्या सृष्टीतील निसर्ग, मानव आणि समाज ह्यांच्यातच फिरते.

निसर्गाबाबत तो तीन पध्दतींनी सामोरा जातो.

१) निसर्ग देव आहे आणि आपण त्या निसर्गाचेच अपरिहार्य भाग आहोत. उदाहरणार्थ शाळेबद्दल १ व २ मध्ये मुलांच्या दृष्टीतून

माणसाने निसर्ग एकात्मता शोधली आहे.

२) निसर्गाबाबत पारंपरिक मराठी दृष्टीकोनाचे विरूपण. उदाहरणार्थ पाऊस किंवा सरावणा ह्या दोन्ही कवितात पावसावरच्या, श्रावणावरच्या रोमॅण्टीक कवितांना जाणीवपूर्वक छेद दिला आहे.

३) निसर्ग म्हणजे स्वत:चे भूमीक्षेत्र सृजनाचे अरण्यबेटमध्ये हे प्रखरपणे व्यक्त होते. चर्चामध्ये तर निसर्गाबाबत वर्गवादी आणि जातीवादी असे दोन्ही प्रवाह येतात.

ह्यातील सरावणामध्ये श्रावण हा हर्षमानसी होण्याऐवजी उपासाचे निमित्त पुरवणारा होतो. पाऊसमध्ये पाऊस पाडणारा भीमराया स्वत:च पुरात वाहून जातो. उपरोधाचे हे शस्त्र भुजंग आपल्या कवितेत वारंवार परजताना दिसतो. अनेकदा त्याची कविता ज्या निष्कर्षांनी सुरू होते त्यांच्याविरूद्ध निष्कर्ष काढून संपते. ह्या संदर्भात 'त्यांच्या बोलण्याबद्दल' 'ग्रॅण्डफादर' ह्या कवितांची सुरूवात आणि शेवट ह्यामधले विरोधाभास पाहण्यासारखे आहेत.

भुजंग ह्या निसर्गात अमूर्तपणाने रमण्यापेक्षा निसर्ग आणि त्या निसर्गाशीसंबंधीत असलेले लोकजीवन ह्यांनाच प्रामुख्याने भिडतो. सर्वसाधारण सहा प्रकारच्या आक्रमकाविरूद्ध ही कविता बोलते.

१) पंडिती आक्रमक - उदा. त्यांच्या बोलण्याबद्दल, फडफडणारा डोळा, तानाजी सेडाम (मास्तर), आऊटसायडर पंडीत स्वत:च्या हिंदु मेगॅस्ट्रक्चरमधे आदिवासींना सामावून घेतात. स्वत:च्या फूटपट्ट्यांनी मूल्यमापन करतात. त्याविरूद्ध भुजंग आवाज उठवतो.

२) सरंजामवादी आक्रमक - निंदणी किंवा नागपुत्र, नागीण, नागवत पेटले आहे, स्त्रीला आपली मालमत्ता समजणाऱ्याविरूद्ध आवाज उठवतो.

३) व्यापारी व ठेकेदारी आक्रमक - नर्मदेशी बातचीत, कलाहंडी, हमी, बाजारहाट ह्या सर्वच कवितात तो औद्योगिक आक्रमक आणि दरिद्री आदिवासी ह्यांच्यातील कार्यकारण संबंध तपासतो.

४) सांस्कृतिक आक्रमक - होळी, बोली, विज्ञनबाई ह्या कवितात आदिवासींच्या सांस्कृतिक अविष्कारांना वापरणाऱ्या किंवा कॅश करणाऱ्या, द्वेष करणाऱ्या प्रवृत्तींविरूद्ध निवेदक आवाज उठवतो.

५) सरकारी आक्रमक - सेटलमेंट, नुरसिंग राठोड ह्यात मात्र सुधारणांवर सूक्ष्म हल्ला आहे.

६) ग्रॅंडफादरमध्ये ख्रिश्चन मिशनरींच्या कार्यातला विरोधाभास साक्षात केला आहे. त्यांच्या आक्रमणाचे सूक्ष्मचित्रण इथे दिसते. ह्या सर्व आक्रमकांविरूद्ध एक सर्वंकष लढा, एक सर्वंकष विद्रोह ज्याला कवी 'ऊलगुलान' म्हणतो पेटवत ही कविता चालते. किंबहुना ह्या कवितेचा स्थायीभावच विद्रोह आहे. कवीने परखड आत्मपरिक्षणाची गरज प्रतिपादली तरी असे आत्मपरिक्षण फारसे ऊलगुलानमध्ये आढळत नाही. नंतरच्या गालिबनंतरच्या कवितेत ते प्रगाढरूपात प्रकटले आहे. ऊलगुलानचा भर हा आत्मविश्लेषणापेक्षा समाजविश्लेषणावर अधिक आहे. परिवर्तनवादाचे एक सतत डोळस परिक्षण कवी करतो. नामदेव ढसाळ जसे स्वत:मधल्या नकारात्मक बाजूचाही स्विकार करताना दिसतात तसा स्विकार राहू द्या साधा हुंकारदेखील भुजंगच्या कवितेत आढळत नाही. पारंपरिक कवितेतील कवी हा सद्गुणांचा पुतळा हीच प्रतिमा ही कविता वाचताना समोर येते. भुजंगचा कवितेतला आवाज मात्र धीरगंभीर, संथ आहे. त्यात संतापाच्या कडेलोट ओळी भुजंग लिहीत नाही त्याऐवजी एखाद्याने शवविच्छेदन करावं तसं अनुभवाचं विच्छेदन करून त्यांची सृजनात्मक निर्मिती तो करतो.

एकीकडे आक्रमणाचा विचार करतानाच ह्या आक्रमणाविरूध्द लढणाऱ्या परिवर्तनवादाचे माध्यम असणाऱ्या शिक्षण संस्थेच्या संदर्भातही अनेक कविता ह्या संग्रहात येतात. अनेकदा तर ही शिक्षणसंस्थाच कशी परंपरेला शाबूत ठेवते त्याचे निवेदन तानाजी सिडाम, भेटलेल्या कविता ह्यासारख्या कवितात येते. मात्र भुजंग केवळ परंपराशरणतेपाशी थांबत नाही तर त्या परंपरेशी त्याचे नायक लढताना दिसताना पारंपारिक व्यवसाय नाकारतात. बाजारहाटमध्ये तर नायिकेचा पोरगा बाजारावरचं वहीत लिहीतो आणि भांडवलशाहीचा पहिला धडा गिरवतो. भुजंगच्या नायिका शिक्षणाचं महत्त्व ओळखून पोराला शिक्षण मिळावं म्हणून धडपडतात.

उदा. ***सरावणामध्ये पर्वा बाजारात महागेल गवताचा भारा, येत्याच घेईलन कारी कारी पाटी***

असंच नायिका पुढे म्हणते, ***छप्पर फोड पण पाटी फोडू नको*** पुढे तर ... अशी श्रावणाला प्रार्थना करते.

शिक्षणाविषयीची ही सची कळकळ भुजंगच्या साऱ्याच कवितांत दिसते. कुठल्याही कवीपुढे किंबहुना व्यक्तिपुढे परंपरेबाबत तीन पर्याय असतात.

१) परंपरा जतन करणे

२) परंपरेच्या विरोधात उभे ठाकणे

३) परंपरेला नवा अन्वय देऊन तिचा विधायक विकास घडवणे

भुजंग बाहेरील लोकांची जी मेगॅस्ट्रक्चरल महारचनावादी परंपरा तिला नाकारतो. पण हा नकार सर्वंकष नाही तो ह्या परंपरेतील बुद्ध आणि डॉ. आंबेडकर ह्यांचा स्विकार करतो. मार्क्सबद्दल मात्र त्याची स्थिती दोलायमान झालेली दिसते. बाहेरून येणाऱ्या आधुनिकीकरणाचे काय करायचे हा प्रश्न त्याला सोडवता आलाय असे वाटत नाही. ह्याबाबत -

१) आधुनिकीकरण जसे आहे तसे स्विकारणे,
२) आधुनिकीकरणातील काही स्विकारणे काही नाकारणे,
३) आधुनिकीकरणाला नकार देणे,
४) आधुनिकीकरणाचे आदिवासीकरण करून ते सामावून घेणे असे पर्याय आहेत.

परंपरा आणि आधुनिकतेने त्याच्यापुढे निर्माण केलेले प्रश्न हे केवळ त्याचे नाहीत तर संपूर्ण आदिवासी समाजाचे आहेत.

परंपरा जशी आहे तशी स्विकारणे शक्यच नाही हे त्याला उमगलेले आहे. त्यामुळे तो परंपरेच्या विरोधात तरी उभा रहातो किंवा तिला नवा अन्वयार्थ देऊन तिचा विकास करतो.

भारतात वैदिकांनी केवळ लिखित परंपरेवर वर्चस्व ठेवून स्वतःचा प्रवाह हाच ह्या संस्कृतिचा मुख्य प्रवाह आहे असा आभास नेहमीच निर्माण केला आहे. वास्तविक ब्राह्मणेतर दलित आदिवासींचा अनार्य प्रवाह हाच ह्या देशाचा मुख्य सांस्कृतिक प्रवाह आहे. माझ्या अंदाजानुसार भुजंगलाही हे मान्य आहे. त्यामुळेच होळी ह्या कवितेत शिमगा आमचाच असे तो निःसंदिग्ध सांगतो आणि ज्यांचा हा सण आहे त्यांना आता मात्र चोरी करून तो साजरा करावा लागतो हा विरोधाभासही तो अधोरेखीत करतो. आपल्या परंपरेच्या हडप्पा शहरापर्यंत तो पोचतो. नागपुत्र ह्या कवितेत तो इतिहासाला उलटापालट करून बघतो. तिज्ञनवाचला तो म्हणूनच ज्यांनी हडप्पा हडपताना फोडले बांध, त्यांचे वारस धरताहेत त्याच प्रकल्पांचा आग्रह असा इतिहास आणि वर्तमान ह्यांच्यातून निर्माण झालेला विरोधाभास दाखवतो.

परंपरेचा एक मोठा भाग म्हणजे भाषा. भुजंग आदिवासी भाषात कविता लिहून त्यांचे जतन करू इच्छितो. त्याचबरोबर 'बोली'सारख्या कवितेत तो 'गारगोटीच्या ठिणगीसारखी माझी गारपोटी' असा अभिमान मिरवतो. तिच्या आईचा कुणीच पत्ता मागत नाही अशी खंतही तो व्यक्त करतो. भुजंगच्या ह्याबाबतीतल्या तीव्र भावना समजून घेतल्या तरी केवळ भावनिकीकरणाने भाषेचे प्रश्न सुटतील असे मला वाटत नाही. एकीकडे प्रमाण भाषांत लिहायचे आणि दुसरीकडे बोली भाषांच्या संरक्षणाचा आग्रह धरायचा. इतकेच नव्हे तर त्या कविता प्रमाण भाषेत अनुवादीत करायच्या. ह्यामधला विरोधाभास भुजंगला जाणवतो की नाही हाही एक प्रश्नच आहे. जर त्याने बोली भाषेत कविता लिहिली असती तर माझ्याकडून हे समीक्षा लेखन झाले नसते हेही खरे. जर भुजंगने मी फक्त माझ्या समाजासाठी लिहितो असा स्टान्स घेतला असता तर त्याचा हा विरोधाभास निर्माण झाला नसता पण भुजंगची कविता ही सर्व मराठी वाचकांसाठी लिहिली जाते हे स्पष्टच दिसते. आदिवासी अवकाशाचे अनुभव हे प्रमाण भाषेला आदिवासी वळण देत व्यक्त करणे शक्य आहे हे त्याच्याच कवितेतून सिध्द होते. प्रमाण भाषेतील झाडीपट्टी आणि भुजंगची झाडीपट्टी ह्यांच्यातला फरक तर स्पष्टच जाणवतो. भुजंग प्रमाण भाषेचे आदिवासीकरण घडवून आणण्यात यशस्वी होतो हाही त्याच्या प्रतिभेचाच पुरावा मानला पाहिजे. आदिवासी भाषांबाबत सर्वात मोठा प्रश्न विज्ञान आणि तंत्रज्ञानाबाबत आहे. हे विज्ञान व तंत्रज्ञान तुम्ही नाकारणार असाल तर प्रश्न संपतो पण त्याचा स्विकार करायचा असेल तर परधानी, बंजारी, वारली ह्या भाषा आईन्स्टाईनची थेअरी ऑफ रिलेटीव्हिटी किंवा गणितातले, भूमितीतले अनेक सिध्दांत कशा पेलणार हे तुम्ही आम्हाला सांगितलं पाहिजे हा प्रश्न केवळ भुजंग बाबतीच नाही तर मी ज्या कोकणातून आलोय तिथे उत्तर कोकणी, मालवणी, आजरा, कणकवली कोकणी, गोवत कोकणी, कारवारी अशाच बोली आहेत आणि त्यांच्यापुढेही हाच प्रश्न मी टाकलाय. नेमाडे हे भाषेचा विचार साहित्यापुरताच करत असल्याने त्यांना असले प्रश्न पडत नाहीत. भुजंगलाही हे प्रश्न पडतात की नाही कुणास ठाऊक? माझ्या मते हा प्रश्न प्रमाण भाषेचे दलितीकरण, आदिवासीकरण आणि प्रादेशिकीकरण घडवून आणूनच सोडवता येईल. बोली भाषांचा पुरस्कार करून तो सुटणार नाही तर बोली भाषांचे प्रमाणीकरण करूनच तो सोडवता येईल. भुजंगच्या कवितेने विशेषतः आदिवासी कवितांनी भाषेचे प्रश्न ऐरणीवर आणले आहेत आणि त्यात ऊलगुलानचा महत्त्वाचा वाटा आहे. एकीकडे प्रमाण भाषेचे आदिवासीकरण, दलितीकरण, प्रादेशिकीकरण तर दुसरीकडे

बोलीचे प्रमाणीकरण घडवतच हा प्रश्न सोडवावा लागेल. भुजंग परंपरेतले पर्यावरणाशी माणसाचे असलेले जैविक नातेही जपू इच्छितो. मात्र ठेकेदारांनी उभ्या केलेल्या पर्यावरणवादी चळवळीला त्याने नर्मदेवरच्या कवितेत विरोधच केला आहे.

परंपरेने चालत आलेल्या वर्ण-जाती व्यवस्थेला त्याचा कडक विरोध आहे. त्यामुळेच तो डॉ. आंबेडकर आणि भगवान बुध्दांना आपले मानतो. समुद्रपुत्रमध्ये डॉ. आंबेडकर तर ग्रँडफादर बुध्द त्याला जवळचे वाटतात हे स्पष्टच दिसते. ह्या दोघांपेक्षाही त्याची आंतरिक नाळ बिरसा मुंडाशी अधिक जुळते. त्याच्यावरची त्याची कविता ही मराठीतील उत्तम चरित्र कवितांपैकी एक आहे. आवेग, जोश, स्फूर्ती ह्यांचे अत्यंत चढे दर्शन ह्या कवितेत घडते. जांगड सारख्या कवितेत जातीव्यवस्थेतील एका वेगळ्याच पोटजातीचं दर्शन तो घडवतो तर शिव्या म्हणून कोणी कातकरी म्हणतील तर त्यालाही माझा नकार आहे असे तो सांगतो.

**पर जवा मही पोटजात मले मुठीत थोपवते**
**तवा मुठीतल्या लाखाचे राख होऊन जाते (गंडी)**
**हे त्याचे निष्कर्ष आहेत.**
**पण नामंजूर मला गोडे परधान थोटीची उतरंड**
**क आणि म मध्ये अडकलेला काज**
**वाघांचा उंदरामागे पळाल्याचा इतिहास**
**जमातीच्या भुरट्या चोऱ्या**
**वनवाशांची गोड गाणी**
**शिव्यांचा शब्दकोशातला कातोडी.**
**गोंडवनातील लाचार घोषणा : जयसेवा**
**पुस्तकातले मागास हिंदू**
**झाडीतले भामट : भोंदू (शोधयात्रा)**

असा एक नकार भुजंगनेच आपल्या कवितेत नोंदवून ठेवलाय.

मिशनऱ्यांची चर्चीक प्रार्थना; सर्वोदयाची वनवासी परिक्रमा, कॉम्रेडांचा वर्गवारी मोर्चा सर्वच जण आदिवासींना वाटून घेतात. त्यांच्या कामांना भुजंग अभयारण्यातील सुखरूप नर्सरी प्रयोगशाळा म्हणतो. आदिवासींना पुस्तकातले मागास हिंदू म्हणणे हा प्रत्यक्षात इथल्या वसाहतवादाचा हिंदूंच्यावर झालेला दुष्परिणाम आहे ह्याची जाणीव भुजंगला आहे की नाही ते स्पष्ट होत नाही. ख्रिश्चन मिशनऱ्यांनी ह्या देशात प्रथम उद्धारकर्त्यांची भूमिका आणली आजही ह्याच भूमिकेतून हा उध्दार चालू आहे. ह्या उध्दाराचे अनुकरण नंतर सर्वोदयवादी, वर्गवादी आणि अलिकडेच हिंदुत्ववादी ह्यांनी करायला सुरवात केली आहे. भुजंगच्या कवितेतून देशीवाद ठिबकतो पण वसाहतवादाने ह्या देशातील संरचनात जो बदल घडवला त्याचे अत्यंत बारकाईने विश्लेषण त्याने करणे गरजेचे आहे असे त्यांच्या कविता वाचताना वारंवार वाटते. भारतात आलेली आधुनिकता ही प्रथम वसाहतवादाचा चेहरा घेऊन आली होती आणि हीच आधुनिकता आदिवासींच्या जंगलात घुसल्याने आदिवासींच्या समस्यात वसाहतवादही चोरपावलाने वावरतो हे लक्षात घेणे गरजेचे आहे. भुजंगने त्याची दखल पुरेशा प्रमाणात घेतलीये असे त्याच्या कवितेवरून वाटत नाही.

नेमाडे आणि गणेश देवी ह्या देशीवाद्यांनी आदिवासी अस्मितांना गोंजारण्याचे काम नेहमीच केले आहे हे दोघेही प्रगती आणि विकास ह्याविषयीच्या त्यांच्या संकल्पना कधीच स्पष्ट करत नाहीत भुजंगही त्याच्या कवितामध्ये हाच वारसा चालवतो. आदिवासीबाबत :

१) त्यांची संस्कृती पूर्णपणे स्वायत्त ठेवणे.

२) त्यांनी आधुनिकीकरणात पूर्णपणे विरघळून जाणे.

असे नेहमीच दोन टोकाचे पर्याय सुचवले जातात.

अमेरिकेत रेड इंडियन्सपैकी काहींना अमेरिकन सरकारने असे स्वायत्त ठेवले आणि नंतर अवस्था अशी झाली की लोक, हे पहा आदिवासी म्हणून त्यांना बघायला येऊ लागले आणि त्या आदिवासी संस्कृतीचे रुपांतर टूरिस्ट सेंटरमध्ये झाले. प्रथम आदिवासी संस्कृती ही स्टडी सेंटर झाली आणि १९६० नंतर ती टूरीस्ट सेंटर बनत आहे. भारतात स्टडी सेंटरची स्टेप पूर्ण झाली आहे आणि टूरीस्ट सेंटरची स्टेप टाकली जाणारच नाही ह्याची खात्री नाही. भुजंगने स्टडी सेंटर होण्यासंदर्भातला आपला संताप वारंवार कवितेत प्रकट केला आहे. ह्या संतापामागची अस्वस्थता आपल्या पुण्या-मुंबईतल्या समीक्षकांना कळणे कठीणच आहे. ह्यामुळेच त्यांच्या बोलण्याबद्दल सारखी कविता का जन्मते हे ह्या समीक्षकांना समजत नाही. भुजंगला संस्कृती स्वायत्त ठेवणे कठीण आहे हे जाणवतंच पण आधुनिकीकरणात विरघळून जाण्याची त्याची तयारी नाही. त्याच्याच भाषेत सांगायचे तर 'मात्र तुमचा अंगठा शाबूत असू द्या' असे म्हणत तो आपला अंगठा शाबूत ठेवू इच्छितो.

माझ्या मते आधुनिकीकरणाचे (१) तांत्रिकीकरण आणि (२) सामाजिकीकरण असे दोन आयाम आहेत. ह्यातील तांत्रिकीकरण आदिवासींनी सहज स्विकारावे तर सामाजिकीकरण मात्र आपला अंगठा शाबूत ठेवून आपल्या अटीवर आपल्या अंगभूत रचनेतून साकार करावे. आधुनिकतेचे आदिवासीकरण करावे, भुजंगला कदाचित हे मान्यच होणार नाही. पण मला वाटते ह्याला पर्याय नाही अन्यथा तांत्रिकीकरण आत्मसात केलेला समाज हा सतत आदिवासींचे शोषण करत राहील. भुजंगच्याच परिभाषेत सांगायचे त्याच्या पायवाटेचीही हमी त्याला मिळणार नाही.

भुजंग आपल्या परंपरेतील काही अंधश्रध्देविरूध्दही उभा ठाकतो. त्यांचा काव्यात्मक अनुभव 'रगत' सारख्या कवितेत देतो. अनेकदा तो परंपरेतील गोष्टींना नवा अन्वयार्थ देतो. 'मार्बत' 'गावबांधणी आणि भेदीक' ह्या कविता ह्या दृष्टिने पहाण्यात

भेदिकमधला निवेदक परंपरेऐवजी समकालीन वास्तवाला सामोरा जातो आणि मगच स्वतःचे विश्व मांडतो. गावबांधणीत तर लढ्याच्या भेदक सूचनाच निवेदक देतो. जे व्हायचं ते होवो म्हणत हा निवेदक थेट कलाहांडीपर्यंत पोचतो. नर्मदा आणि इंद्रावती ह्या नद्यांच्या निमित्तानेही स्वतःच्या संस्कृतिची भुजंग तपासणी करतो. पांडवांनी मध्ये तर महाभारत आणि आजचा भारत असा विरोधाभास गडद करत सांस्कृतिक वेठबिगारीवर प्रकाश टाकला जातो.

भुजंगच्या कवितांमध्ये ज्यांना प्रतिकात्मक कविता म्हणाव्या अशाही बऱ्याच कविता आहेत. एखादी घटना घडते आणि मग त्या घटनेला प्रतिक्रिया म्हणून कविता जन्मते. वेडा म्हातारा अंगात येतो तेव्हा, सेटलमेंट, २९ जून १९८०, वाघ, कलाहंडी, बातचीत नर्मदेशी ह्या कवितांचा उल्लेख ह्या संदर्भात करता येतो. जेव्हा घटनांचा आघात खोलवर जातो तेव्हा कलाहंडीसारखी अप्रतिम कविता जन्मते. भूक बळीवरची ही कविता आपणाला समूळ हलवते. ह्याउलट 'वाघ' ह्या कवितेत आघात पुरेसा खोल गेलेला नाही त्यामुळे महानगरीय तपशिलात आघात विस्कळीत होत जातो. वेडा म्हातारा अंगात येतो तेव्हा किंवा नर्मदेशी बातचीत ह्याही जरा जमलेल्या कविता. ह्या कविता आदिवासींवरच्या अन्यायांना वाचा फोडतात आणि अनेकदा आपल्या व्यवस्थेचा दांभिकपणाही उघडा पाडतात.

भुजंगच्या स्वतःच्या व इतरांच्या शाळेबद्दलच्या कविता ह्या सुंदरच आहेत. मी ह्या कवितातील विद्रोहाला निरागस विद्रोह म्हणेन. हा निरागस विद्रोह बालपणामुळे निरागस आहे. पण ज्या बालकांनी किंवा विद्यार्थ्यांनी तो पुकारलाय त्यांना आतून कुठेतरी व्यवस्थेचा दाब जाणवला आहे. भुजंग त्या त्या पात्राच्या व्यक्तिरेखेत इतक्या सहजपणे घुसलाय की ते पात्र आणि निवेदक ह्यांच्यात कसलेच द्वैत शिल्लक रहात नाही.

भुजंगच्या ऊलगुलानमधल्या ज्या महानगरीय अवकाशाशी संबंधित कविता आहेत. त्यातील 'अस्तीत्व' 'पूल' ह्या दोन जमलेल्या कविता आहेत त्यातील निवेदक हा महानगरात आलेला आदिवासी असून तो आऊटसायडर म्हणूनच वावरताना दिसतो. दोन्ही कवितात स्वतःला जागं ठेवण्याची घडपड आहे. पूलमध्ये कॉस्मॉपॉलिटीन कडबोळ्याचा ट्रेनमधला अनुभव आहे तर अस्तित्वमधे संपूर्ण शहराला कवी रिॲक्ट करतो. भुजंगच्या प्रेमकविता ह्या प्रामुख्याने महानगराशीच जोडलेल्या असाव्यात हे आश्चर्य आहे. ह्या प्रेमकविताही निखळ प्रेमकविता आढळत नाहीत. प्रेमावरही सामाजिकतेचा दाब पडलेला आहे. 'निमित्तमात्र चिमणी' या शहरावर ह्या कविता ह्या संदर्भात पहाव्यात. मध्यमवर्गीय संवेदनशीलतेवरच्या कवितांची भट्टी नीट जमलीये असे वाटत नाही. खुद्द निवेदकालाच ह्या बाबतीत पुरेशी स्वच्छ दृष्टी प्राप्त झालीये असे वाटत नाही.

भुजंग देशीवाद्यांनी आणलेल्या थेट अविष्काराशैलीचाच अवलंब करतो. स्वतःच्या वास्तवातूनच तो तपशिल निवडतो मात्र ह्या तपशिलाचा अन्वयार्थ मूलतः आदिवासीकरणाशी निगडीत असल्याने त्याच्या प्रतिमा ह्या क्रांतिकारक प्रतिमासृष्टीचा अविष्कार करत नसल्या तरी दलित साहित्याने निर्माण केलेल्या प्रतिमासृष्टीला एक नवे वळण देतात. नाही रे वर्गाच्या नारायण सुर्वे, नामदेव ढसाळ ह्या दोन टप्प्यानंतर भुजंग मेश्राम दलीत कविता तिसऱ्या टप्प्याशी आणून सोडतो. हे तिघंही देशीवादी असले तरी सुर्वेंच्या देशीवादाचा विकास तर ढसाळांच्या देशीवादाचा विकास भुजंग घडवून आणतो. नेमाडेंच्या पुढे जाणारी कादंबरी श्याम मनोहर यांनी लिहिली तर ढसाळांच्या पुढे जाणारी कविता भुजंग लिहित आहे. विशेषतः त्याच्या अलिकडच्या काळातील कविता हे काम नेटकेपणाने करीत आहेत. देशीवादाचा विस्तार करणारे, विकास करणारे तीन महत्त्वाचे कवी १९५० नंतर निर्माण झालेत. विवेक राजापुरे, दिलीप कुलकर्णी आणि भुजंग मेश्राम. ह्या तिघांच्यात श्रेष्ठ आहे असे मला वाटते. पहिल्या दोघांच्या अकाली निधनाने तर भुजंग हा अधिकच ताकदीचा वाटतो.

